**अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१२१६/(३३२/२०१६)/भाग-१/आ.(वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**तारीख: १ एप्रिल, २०१७.**

<u>वाचा:-</u> सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.ईएसबी-१११६/प्र.क्र.७६/१६, दि.०२.१२.२०१६.

**<u>शासन आदेश :-</u>**

जलसंपदा विभागातील पुढील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांना अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर रुपये १५६००-३९१०० श्रेणीवेतन (Grade pay) रु.७६०० या वेतनश्रेणीत संदर्भीय दि.०२.१२.२०१६ च्या पत्रान्वये आस्थापना मंडळाने शिफारस केल्यानुसार **तात्पुरत्या स्वरुपात** पदोन्नती देण्यात येत आहे.

१. श्री.उमाशंकर नारायण वाकोडीकर (अ.ज.) (ज्ये.क्र.६६)

२. वर नमूद अधिकाऱ्यास खालील अटींच्या अधीन राहून तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे :-

१) सदर पदोन्नती ही तदर्थ व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

२) सदर पदोन्नती ज्येष्ठतासूचीसंदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे श्री.रा.द.वर्धने व इतर यांनी दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.१०७८/२०१६ (पूर्वीचा मूळ अर्ज क्र.४४३/२०१४) व श्री.सु.ब.चव्हाण व इतर यांनी दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.७११/२०१४ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहील.

३) सदर पदोन्नती महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ (ज्येष्ठता विनियम व ज्येष्ठता यादीची सुधारणा) नियम, १९८३ अन्वये सुधारित होणाऱ्या कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या ज्येष्ठतेच्या अधीन राहील.

४) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३. पदोन्नत झालेल्या वरील अधिकाऱ्यास सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.उमाशंकर नारायणराव वाकोडीकर | कार्यकारी अभियंता, गोसीखुर्द पुनर्वसन विभाग, नागपूर. | अधीक्षक अभियंता व सचिव, आंतरराज्य नियंत्रण मंडळ, नागपूर. | रिक्त पदी. |

४. संबंधीत वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वरील पदोन्नत अधिकाऱ्यास पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, पदोन्नत अधिकाऱ्यास पदोन्नतीने नियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांनी अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतननिश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्रमांक ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन, करण्यात यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११७०२०७७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2017.04.01 17:58:28 +05'30'

(अतुल कोदे)
शासनाचे सह सचिव

प्रत,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.

३) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व महासंचालक/कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
७) सचिव, आंतरराज्य नियंत्रण मंडळ, नागपूर.
८) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई .
९) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१०) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
११) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
१२) संबंधीत अधिकारी.
१३) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४) खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१५) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई
१६) उप सचिव (का.१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) उप सचिव (का.१३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१९) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.